


**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
मंत्रालय (मुख्य इमारत), दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई .०३२ ४००

---

क्रमांक- आरएलपी- ०१२२/प्र.क्र.१६/विशा- १ ब दिनांक- १४ फेब्रुवारी, २०२२.

## परिपत्रक

## "छत्रपती शिवाजी महाराज जयंती" २०२२ मार्गदर्शक सूचना

छत्रपती शिवाजी महाराज यांच्या जयंतीनिमित्त महाराष्ट्र सरकारने निश्चित केल्यानुसार दि. १९ फेब्रुवारी रोजी महाराष्ट्रभर हा उत्सव दरवर्षी मोठ्या उत्साहाने साजरा केला जातो. कोरोना विषाणूच्या ओमिक्रॉन प्रजातीचे संक्रमण अद्याप सुरु आहे. या पार्श्वभूमीवर नागरिकांनी मोठ्या प्रमाणात एकत्र येऊन गर्दी करुन उत्सव साजरा न करता स्वत:च्या व इतरांच्या आरोग्याच्या दृष्टीकोनातून काळजी घेऊन "छत्रपती शिवाजी महाराज जयंती" उत्सव साजरा करणे आवश्यक आहे. त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना करण्यात येत आहेत.:-

१. कोवीड- १९ च्या संसर्गजन्य परिस्थितीचा विचार करता महाराष्ट्र शासन महसूल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभागाचे परिपत्रक क्र.- DMU/ २०२०/ CR.९२/ DisM-१, दि. ८/१/२०२२ तसेच क्र. DMU/२०२०/ CR.९२/DisM-१, दि. ३१/१/ २०२२ अंतर्गत दिलेल्या सूचनांचे काटेकोर पालन करावे.
२. दिनांक १९ फेब्रुवारी, २०२२ रोजी "छत्रपती शिवाजी महाराज जयंती" (शिवजयंती) साजरी करत असताना शिवज्योत वाहण्याकरिता २०० भाविकांना व शिवजयंती उत्सवाकरिता ५०० भाविकांना परवानगी देण्यात येत आहे.
३. अनेक शिवप्रेमी, छत्रपती शिवाजी महाराजांचा जन्म झालेल्या शिवनेरी अथवा इतर गड/ किल्ल्यांवर जाऊन तारखेनुसार दि. १८ फेब्रुवारी रोजीच्या मध्यरात्री १२ वाजता एकत्र येऊन "छत्रपती शिवाजी महाराज जयंती" साजरी करतात. परंतु यावर्षी कोविड-१९ चा प्रादुर्भाव टाळण्यासाठी मोठ्या प्रमाणात एकत्र न येता "छत्रपती शिवाजी महाराज जयंती" उत्सव साजरा करणे अपेक्षित आहे.
४. दरवर्षी "छत्रपती शिवाजी महाराज जयंती" साजरी करताना संपूर्ण महाराष्ट्रात विविध कार्यक्रमांचे आयोजन केले जाते. परंतु यावर्षी सांस्कृतिक कार्यक्रमांचे मोठ्या प्रमाणावर आयोजन करण्यात येऊ नये. त्याऐवजी सदर कार्यक्रमाचे केबल नेटवर्क अथवा ऑनलाइन प्रक्षेपण उपलब्ध करुन देण्याबाबत व्यवस्था करण्यात यावी.

५. प्रभात फेरी, बाईक रॅली अथवा मिरवणुका काढण्यात येऊ नयेत. त्याऐवजी छत्रपती शिवाजी महाराजांच्या पुतळ्याला/प्रतिमेला पुष्पहार अर्पण करण्याचा कार्यक्रम आयोजित करुन त्या ठिकाणी सोशल डिस्टन्सींगचे पालन करून छत्रपती “शिवाजी महाराज जयंती” साजरी करावी.

६. “छत्रपती शिवाजी महाराज जयंती”च्या दिवशी आरोग्यविषयक उपक्रम/शिबिरे (उदा. रक्तदान) आयोजित करण्यास प्राधान्य देण्यात यावे आणि त्याद्वारे कोरोना, मलेरिया, डेंग्यू इत्यादी आजार आणि त्यांचे प्रतिबंधात्मक उपाय तसेच स्वच्छता यांबाबत जनजागृती करण्यात यावी. आरोग्य विषयक उपक्रमांचे आयोजन करताना त्या ठिकाणी सोशल डिस्टन्सींग तसेच स्वच्छतेचे नियम (मास्क, सॅनिटायझर इत्यादी) पाळण्याकडे विशेष लक्ष देण्यात यावे.

७. कोविड- १९ च्या विषाणूंचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी शासनाच्या मदत व पुनर्वसन, आरोग्य, पर्यावरण, वैद्यकीय शिक्षण विभाग तसेच संबंधित महानगरपालिका, पोलीस प्रशासन, स्थानिक प्रशासन यांनी विहित केलेल्या नियमांचे काटेकोर पालन करावे. तसेच या परिपत्रकानंतर व प्रत्यक्ष सण सुरु होण्याच्या मधल्या कालावधीत अजून काही सूचना प्रसिध्द झाल्यास त्यांचे देखील अनुपालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०२१४१७४५४५५८२९ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Dagadu Khedekar

Digitally signed by Sanjay Dagadu Khedekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a53701d2758331055dd3c46d615f8367912b1c64cd218e709c1b4de20bdf4f85, cn=Sanjay Dagadu Khedekar
Date: 2022.02.14 17:47:46 +05'30'

**( संजय खेडेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधीपक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.

८. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. सर्व मा. महापौर, महानगर पालिका.
१२. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१३. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
१४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१६. सचिव व महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७. सर्व आयुक्त, महानगर पालिका.
१८. सर्व पोलीस आयुक्त.
१९. सर्व जिल्हाधिकारी.
२०. सर्व पोलीस अधीक्षक.
२१. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका.
२२. निवडनस्ती.